# स्टीव्हन आणि हिरवे कासव

लेखक: विल्यम क्रोमी

चित्रे: टॉम इटन



# स्टीव्हन आणि हिरवे कासव

मराठी अनुवाद: सुशील मेन्सन



# भाग 1

*स्टीव्हन*ने आयुष्यात कधीच असं चमत्कारिक दृश्य पाहिलं नव्हतं.

समुद्रकिनारी कासवांची शेकडो पिल्लं आली होती.



स्टीव्हन *कोस्टा रिका* देशात राहात होता.

आजवर त्याने नेहमी मोठे आणि वयस्कर कासव बघितले होते.

पण त्याने कासवांची पिल्लं कधी पाहिली नव्हती.

U.S.A.
MEXICO
BRITISH HONDURAS
HONDURAS
GUATEMALA
EL SALVADOR
NICARAGUA
COSTA RICA
PANAMA
NICKY'S ROUTE
STEVEN'S VILLAGE

समुद्रकाठच्या खड्ड्यांमधून खेकडे बाहेर येऊ लागले.

ते कासवांच्या पिल्लांचा पाठलाग करू लागले.

एका खेकड्याने आपल्या काटेरी पंजांनी एक कासवाचं पिल्लू धरलं.

तो खेकडा त्या पिल्लाला फरफटत आपल्या खड्ड्याकडे नेऊ लागला.



स्टीव्हनने कासवाच्या पिल्लाला धरलं.

त्याने त्याला मुक्त करायचा प्रयत्न केला.

पण खेकड्याने पिल्लाला दाबून धरलं होतं.

मग स्टीव्हनने खेकड्याला एका ओंडक्यावर आपटलं.





याने काम झालं!

खेकड्याने कासवाच्या पिल्लाला सोडून दिलं आणि तो पळून गेला.

कासवाचं पिल्लू आता मुक्त होतं.

कासवाला वल्ह्यांसारखे फ्लिपर होते.
त्याचे मागचे फ्लिपर टेबल टेनिसच्या बॅटसारखे गोल होते.
त्याचे पुढचे फ्लिपर छोट्या पंखांसारखे दिसत होते.
त्यांच्या कडांवर खाचा होत्या.





स्टीव्हनने कधी कुणा कासवाच्या फ्लिपरवर खाचा पाहिल्या नव्हत्या.
“मी तुला *निकी* म्हणत जाईन,” स्टीव्हन म्हणाला. “छान आहेस तू. मला तुला पाळावसं वाटतंय.”

मग त्याने आपलं मन बदललं.

“`मी असा कासव शोधीन ज्याच्या फ्लिपरवर खाचा नाहीत.” तो आणखी चांगलं कासव सापडतंय का ते सभोवती बघू लागला.

अचानक, स्टीव्हनने भुंकण्याचा आवाज ऐकला.

एक कुत्रा कासवांमागे लागलाय, असं त्याला दिसलं.

कुत्र्याने एका कासवाला खाऊन टाकलं.

मग कुत्रा निकीजवळ जाताना स्टीव्हनेने पाहिलं.

“त्या कासवापासून दूर हो!” स्टीव्हन किंचाळला.

त्याने कुत्र्याला पळवून लावलं.



स्टीव्हनने निकीला
समुद्राकडे जाताना
पाहिलं.



ते छोटं कासव मंद गतीने आणि
बेशिस्तपणे चालत होतं.
तेवढ्यात एक पक्षी निकीला
धरण्यासाठी झेपावला.
स्टीव्हन निकीला मदत करण्यास पुढे
धावला.
पक्ष्याने निकीला चोचीत धरलं.
पक्षी उडू लागला.

पण छोटं कासव पक्ष्याच्या चोचीतून निसटलं.
कासव आपल्या पाठीवर खाली पडलं.



स्टीव्हनने त्याला सरळ केलं.
“मला वाटतं की माझ्याविना तू राहू शकणार नाहीस,” तो म्हणाला.
“मला तुला पाळावंच लागेल.”

स्टीव्हनने निकीला समुद्राच्या
पाण्याने भरलेल्या बादलीत ठेवलं.
तो नदीवर जाळं घेऊन गेला.
त्याने काही छोट्या छोट्या कोळंबी
पकडल्या.
त्याने कोळंबी निकीला दिल्या.



कासवाने त्या खाल्ल्या.
निकी वेगाने मोठा झाला.
लवकरच त्या कासवाचा
आकार बादलीपेक्षाही
वाढला.





निकी एक वर्षाचा झाला तेव्हा
त्याला उचलण्यासाठी स्टीव्हनला
दोन हातांची गरज पडू लागली.
निकीला राहाण्यासाठी
त्याच्याकडे पुरेसा मोठा टँक
नव्हता.



स्टीव्हनच्या वडिलांनी निकीसाठी
एक मोठा लाकडी टँक बनवला.
पण कासव वाढतच गेले.



स्टीव्हनच्या वडिलांनी समुद्रात कुंपण घालून एक डबकं बनवलं. ते डबकं कासवा राहाण्यासाठी खूप मोठं होतं.

स्टीव्हनसाठीही ते डबकं पुरेसं मोठं होतं.

तो दररोज आपल्या पाळीव कासवासोबत तिथे पोहू लागला. ते तासनतास तिथे खेळू लागले.

स्टीव्हनने निकीला शिवाशिवी खेळायला शिकवलं.

त्याने कासवाच्या डोक्याला शिवलं. मग तो लगेच वेगाने दूर गेला.

कासवाने स्टीव्हनचा पाठलाग केला. त्याने आपल्या चोचीने स्टीव्हनला शिवलं.



निकीला पाळीव बनवल्यामुळे स्टीव्हनला हिरव्या कासवांबद्दल आणखी जाणून घ्यावसं वाटू लागलं.





स्टीव्हन आणि त्याचे वडील शहरात गेले. त्यांनी एका मत्स्यालयाला भेट दिली. तेथील तज्ज्ञांना समुद्रात राहाणाऱ्या जीवांबद्दल माहिती होती.

स्टीव्हनने त्यांना त्याच्या कासवाबद्दल सांगितलं.

ते म्हणाले, निकी मादी आहे.

ते म्हणाले, समुद्रात खूप कमी हिरवे कासव उरले आहेत.



शिकारी लोकांनी बऱ्याच कासवांना मारून टाकलं आहे.
ते म्हणाले, निकी मुक्त असणं बरं ठरेल.
मग निकी अशा ठिकाणी जाईल जिथे कासवाचं गवत असेल.
कासवाचं गवत एक समुद्री शैवाल असतं, जे लांब बारीक गवतासारखं दिसतं.
ते गरम उथळ पाण्यात उगवतं.
निकी मोठी झाल्यावर तिचे एका नर कासवाशी मीलन होईल.
ती अंडी देण्यासाठी कोस्टा रिकाच्या समुद्रकिनारी परतेल.
मग त्या अंड्यांमधून छोटे छोटे कासव बाहेर निघतील.





स्टीव्हन आणि त्याच्या वडिलांनी घरी चर्चा केली. त्यांनी निकीला मुक्त करायचं ठरवलं.

त्या रात्री झोपताना स्टीव्हन रडला.





सकाळी सकाळी तो निकीच्या डबक्यात गेला.

ते शिवाशिवीच् खेळ खेळले.

स्टीव्हनने निकीला पकडलं आणि त्याला मायेने कुरवाळलं.

त्या दिवशी दुपारी स्टीव्हनच्या वडिलांनी निकीला मुक्त केलं.

निकीने पोहायला सुरुवात केली.

स्टीव्हनही तिच्यासोबत पोहू लागला.

निकी तिच्या फ्लिपरच्या मदतीने पोहू लागली.

स्टीव्हन तिच्याशी स्पर्धा करू शकला नाही.

त्याला खात्री होती की तो त्याच्या लाडक्या कासवाला पुन्हा कधीच पाहू शकणार नाही.

## भाग 2

निकी पाण्याच्या पृष्ठभागाखाली पोहू लागली.

कधीकधी तिचं डोकं श्वास घेण्यासाठी पाण्याच्या वर येत होतं.

जेव्हा छोटं कासव असं डोकं बाहेर काढतात तेव्हा पक्षी त्यांना पकडतात.

आता निकी एवढी मोठी झाली आहे की पक्षी तिला उचलून नेऊ शकत नाहीत.

पण ती अद्याप धोक्याच्या बाहेर नव्हती. समुद्रात प्रचंड मोठे आणि भुकेले मासे होते.

एकदा निकीने आपल्यासमोर दोन मोठ्ठे मासे पाण्यात असल्याचं पाहिलं.

ते शार्क होते! निकीने उडीच मारली.



एक शार्क तिचा पाठलाग करू लागला.
ती खडकांमधल्या एका भोकात
शिरली.
शार्कने आपलं डोकं त्या भोकात
खुपसण्याचा आणि निकीला
पकडण्याचा प्रयत्न केला.
पण शार्कचं डोकं खूप मोठं होतं. तो
खडकाशी झगडू लागला.



निकी सुरक्षित होती, पण आपला
श्वास रोखून धरू शकेल तोवरच.
ती आपला श्वास तासनतास रोखू
शकत असे. काही वेळाने, शार्कने हार
मानली आणि तो दूर गेला. नंतर
निकीसुद्धा पोहत दूर निघून गेली,



रात्री निकीने पाण्याच्या तळाशी आराम केला.
ती दिवसा पोहली.
ती दोन आठवड्यांपेक्षा जास्त काळ पोहली.
मग निकीने इतर हिरव्या कासवांना पाहिलं. ती जलद वेगाने पोहू लागली.

ती कासवाचं गवत असलेल्या एका मोठ्या कुरणात आली.
खूप वेळ पोहोल्यानंतर, निकीला कमालीची भूक लागली. तिने भरपेट खाऊन घेतलं.

मग तिला पाण्याच्या खाली
एक खडक सापडला.
निकीने या खडकालाच आपलं घर
बनवलं.
दररोज ती कासवाच्या गवताच्या
कुरणात जाऊ लागली.
दररोज रात्री ती आपल्या खडकावर
परतू लागली.
ती अधिकाधिक मोठी होऊ लागली.
ती सात वर्षांची झाली तेव्हा तिचं
वजन सुमारे शंभर पौंड होतं.
तिचं कवच इतकं मोठं होतं की
तिच्या पाठीवर कित्येक मुलं बसू
शकली असती.



स्टीव्हनही मोठा होत होता.

तो नेहमी निकीला न्याहाळत असे.

स्टीव्हन चौदा वर्षांचा झाला तेव्हा

आपल्या काकांना मदत करू

लागला.

ते दोघे खाण्यासाठी मासे आणि

हिरवे कासव पकडू लागले.

## भाग 3

एके दिवशी निकीने कासवाचं

गवत खाणं बंद केलं.

तिने आपला खडकही सोडून

दिला.

ती पोहत पोहत आपल्या

जन्मस्थानाकडे परतू लागली.





आता ती अंडी
घालायला तयार
होती.

इतर माद्याही घरी परतू लागल्या.
त्यांच्यापैकी काहींचा जन्म स्टीव्हनच्या
घरानजिकच्या समुद्रकिनारी झाला होता.
कसंतरी करून निकीला घरची वाट
सापडली.
तिने कदाचित सूर्याची मदत घेतली
असावी.
तिला कदाचित पाण्याच्या प्रवाहाची दिशा
किंवा त्याचा वास जाणवले असावे.
तिने कदाचित तिथले खारे पाणी चाटले
असावे.
निकी खूप वेगाने पोहू शकत होती.
ती खूप मोठी आणि कठीण होती.
बहुतेक मासे तिला खाऊ शकत नव्हते.
शार्कसुद्धा तिच्यावर हल्ला चढवू शकत
नव्हते.

पण कासवाचा एक धोकादायक शत्रू होता, माणूस!

माणसं जाळी आणि भाले वापरून हिरव्या कासवांची शिकार करण्याचा प्रयत्न करत. शिकारी समुद्रकिनाऱ्यानजिक आपल्या नावेत बसून कासवांची वाट बघत.





निकी श्वास घेण्यासाठी एका नावेजवळ आली.

एका शिकाऱ्याने तिला पाहिलं आणि आपला भाला वर उचलला.

पण नावेत आणखी कुणीतरी होतं.

तो स्टीव्हन होता.

स्टीव्हन आपल्या काकांना मदत करत होता.

त्याने खाचा असलेली फ्लिपर बघून निकीला ओळखलं.

“थांबा!” स्टीव्हन ओरडला.

त्याने त्याच्या काकांचा हात पकडला.

“त्या कासवाला मारू नका,” तो म्हणाला.

“मला वाटतं ती निकी आहे.”

“खात्री आहे तुझी?” त्याच्या काकांनी विचारलं.

“तुम्ही निकीसारख्या अशा खाचा असलेलं कासव पाहिलंय का कधी?” स्टीव्हनने विचारलं.

काका नाही म्हणाला.

“पण खात्रीने सांगता येणार नाही,” ते पुढे म्हणाले.



“आपल्याला खायला मांस हवंय.
आपल्याला पैशाचीसुद्धा गरज आहे.
आपण थोडं मांस आणि शिंपले विकू शकतो.”

स्टीव्हनच्या काकांनी पुन्हा त्यांचा भाला वर उचलला.



“नका मारू,” स्टीव्हनने विनंती केली.

“ती अंडी घालायला किनाऱ्यावर चाललीय.
तिला आत्ता मारलंत तर कासवाची पिल्लंच दिसणार नाहीत आपल्याला.”



स्टीव्हनच्या काकांनी भाला खाली ठेवला.

“बरोबर आहे तुझं,” ते म्हणाले.
“नाही मारत मी तिला.”

अंधार पडला की हिरवे कासव
समुद्रकिनारी येतात.
त्या रात्री स्टीव्हनने निकीला
शोधलं.
पण ती आली नाही.
दररोज रात्री स्टीव्हन
समुद्रकिनारी जाऊ लागला.
एके रात्री पौर्णिमेच्या चंद्राचं
तेजस्वी बिंब आभाळात चमकत
होतं.







एक मोठं कासव पाण्याच्या बाहेर
येत असताना स्टीव्हनला दिसलं.
त्या कासवाने समुद्रकिनारा
ओलांडला.
तो त्याच्या काळ्या फ्लिपरने
वाळूत भोक पाडू लागला.
स्टीव्हन कासवाच्या मागे रांगत
रांगत चालू लागला.

तो त्या कासवाला स्पष्टपणे बघू शकत होता.

त्याने त्याच्या पुढच्या फ्लिपरकडे पाहिले.

त्याच्या कडांना खाचा होत्या.

ती निकीच होती!

स्टीव्हनला एवढा आनंद झाला की त्याला रडू आलं.

त्याने निकीला मायेने कुरवाळलं.





निकीने भोक पाडण्याचं काम पूर्ण केलं आणि तिने अंडी घातली.

मग तिने आपलं हे घरटं बुजवलं.

मग ती समुद्रकिनाऱ्यावर जाऊ लागली.

स्टीव्हन तिच्या पाठीवर बसून समुद्राकडे जाऊ लागला.

समुद्रकिनारी पोहोचल्यावर त्याने निकीचा निरोप घेतला.

“तू पुढल्या वेळी अंडी घालायला परत इथे येशील तेव्हा भेटू पुन्हा,” तो म्हणाला.





स्टीव्हनने निकीची अंडी खोदून बाहेर काढली.

ती अंडी त्याने त्याच्या अंगणात पुरली.

पुढल्या दिवशी त्याने त्या घरट्याभोवती एक कुंपण उभारलं.

आता कुत्रे अंडी खोदून काढू शकणार नव्हते.

स्टीव्हनने दोन महिने वाट पाहिली.
मग तो दररोज उजाडण्याआधीच
झोपेतून उठू लागला आणि
घरटं पाहू लागला.
शेवटी एकदाचं वाळुतून एक डोकं
बाहेर आलं.





मग सगळीच पिल्लं वाळुतून बाहेर
येऊ लागली.
एकूण शंभर पिल्लं होती ती.
एका पिल्लाला खाचा असलेली
फ्लिपर होती, असं स्टीव्हनला
दिसलं.

स्टीव्हनने त्या पिल्लाला उचललं.
“तू अगदी तुझ्या आईसारखा
आहेस,” तो म्हणाला.
“मी तुला छोटी निकी म्हणेन.
तू छोटी असेपर्यंत माझ्यासोबत
राहू शकतेस.
मी पक्ष्यांपासून आणि
खेकड्यांपासून तुझं रक्षण करेन.





जेव्हा तुझं कवच मोठं आणि कठीण बनेल,
तेव्हा ते तुला खाऊ शकणार नाहीत.
मग मी तुला सोडून देईन.
तू कासवाच्या गवताकडे पोहत जाऊ
शकशील. तिथेच तुझी आई राहाते.

ती अंडी देण्यासाठी परत इथे येईल. मी दरवर्षी तुम्हा दोघांना शोधत फिरेन."

समाप्त